**राष्ट्रीय महामार्गांच्या कामासाठी गौण खनिज सुलभपणे व नियमितपणे उपलब्ध होण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः गौखनि १०/०४१६/प्र.क्र.३०२/ख**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १४/०६/२०१७

वाचा : (१) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम ४८
(२) महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३

## -: शासन परिपत्रक :-

राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाकडून राज्यात मोठ्या प्रमाणात राष्ट्रीय महामार्गांना मंजूरी देण्यात आली असून, सदर राष्ट्रीय महामार्गांच्या कामासाठी माती, मुरूम व दगड यांची मोठ्या प्रमाणात आवश्यकता आहे. सदर राष्ट्रीय महामार्गांची कामे वेळेवर पूर्ण होण्यासाठी माती, मुरूम व दगड हे गौण खनिज सुलभपणे व नियमितपणे उपलब्ध होणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने या संदर्भातील कार्यपध्दती सुरळीत करण्याच्यादृष्टीने पुढीलप्रमाणे दिशानिर्देश निर्गमित करण्यात येत आहेत :-

(अ) राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण यांच्या कंत्राटदारांनी संबंधित राष्ट्रीय महामार्गाच्या कामाच्या मंजूर अंदाजपत्रानुसार आवश्यक गौण खनिजाचे परिमाण, अशा गौण खनिज उत्खननाची नियोजित ठिकाणे व त्यांच्या गाव नमुना नंबर ७/१२ उतारे यासह संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे गौण खनिजाच्या उत्खननाच्या परवानगीसाठी विहित नमुन्यात अर्ज राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाच्या संबंधित क्षेत्रीय अभियंत्या मार्फत सादर करावा.

(आ) जिल्हाधिकारी यांनी जिल्हा खनिकर्म अधिकारी यांच्यामार्फत संबंधित कामासाठी आवश्यक असलेल्या गौण खनिजासाठी गौण खनिजांच्या स्त्रोतांची तपासणी करुन, सदर ठिकाणे जिल्हा खाणकाम योजनेत समाविष्ट असल्याची खात्री करुन घ्यावी. अशी ठिकाणे जिल्हा खाणकाम योजनेत समाविष्ट नसल्यास, मात्र खाणकामासाठी उपयुक्त असल्यास त्यांचा समावेश जिल्हा खाणकाम योजनेत करण्याबाबत नियमानुसार कार्यवाही करण्यात यावी.

(इ) तदनंतर संबंधित राष्ट्रीय महामार्गाच्या कामाच्या मंजूर अंदाजपत्रकात नमूद गौण खनिजाच्या परिमाणाच्या आधारे स्वामित्वधनाची पूर्ण रक्कम संबंधित कामाच्या कंत्राटदाराकडून आगाऊ शासनजमा करुन, जिल्हाधिकारी यांनी अशा नियोजित ठिकाणातून खाण कामासाठी तात्पुरते परवाने, अर्ज केल्यापासून जास्तीतजास्त ३० दिवसात,

मंजूर करावेत व अशा परवान्याची प्रत संबंधित उपविभागीय अधिकारी, तहसीलदार, मंडळ अधिकारी व तलाठी यांच्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.

(ई) संबंधित उपविभागीय अधिकारी, तहसिलदार व क्षेत्रीय महसूल यंत्रणेने अशा तात्पुरत्या उत्खनन परवान्यांच्या आधारे होणाऱ्या गौण खनिजाच्या उत्खननाच्या/ वापराच्या परिमाणाबाबत वेळोवेळी तपासणी करावी. मात्र, मंजुरीपेक्षा जास्त उत्खनन झाल्याचे किंवा संबंधित राष्ट्रीय महामार्ग प्रकल्पांतर्गत मंजुरीपेक्षा जास्त गौण खनिज वापरण्यात आल्याचे दृष्टोत्पत्तीस आल्यास संबंधित अधिकाऱ्यांनी राष्ट्रीय महामार्गाचे काम न थांबविता त्यांच्या स्तरावर नियमानुसार संबंधित कंत्राटदारास कारवाईची नोटीस देवून ही बाब त्याचवेळी जिल्हाधिकारी यांच्या निदर्शनास आणावी.

(उ) जिल्हाधिकारी यांनी उपविभागीय अधिकारी व तहसिलदार यांच्याकडून प्राप्त अहवालाची छाननी करुन, कंत्राटदाराची कृती राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाच्या संबंधित क्षेत्रीय अभियंत्यांच्या निदर्शनास लेखी आणून, जास्तीच्या गौण खनिज उत्खननापोटी / वापरापोटी वाढीव स्वामित्वधनाची रक्कम ३० दिवसाच्या आत शासनजमा करण्याबाबत संबंधित ठेकेदारास अविलंब कळविण्यात यावे.

(ऊ) संबंधित ठेकेदाराने ३० दिवसाच्या आत गौण खनिजाच्या वाढीव उत्खननापोटी/वापरापोटी स्वामित्वधनाची रक्कम शासनजमा केल्यास एक विशेष बाब म्हणून त्यांच्याविरुध्द महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ४८ (७) नुसार दंडात्मक कारवाई करण्यात येऊ नये. मात्र, संबंधित ठेकेदाराने ३० दिवसाच्या आत गौण खनिजाच्या वाढीव उत्खननापोटी/वापरापोटी स्वामित्वधनाची रक्कम शासनजमा न केल्यास तो दंडात्मक कारवाईस पात्र राहील.

२. सदर राष्ट्रीय महामार्ग प्रकल्पांमुळे राज्यात मोठ्या प्रमाणावर पायाभूत सुविधा निर्माण होऊन, राज्याच्या विकासास चालना मिळणार आहे. त्यामुळे राष्ट्रीय महामार्गांची कामे वेळेवर पूर्ण होण्यासाठी कोणत्याही प्रकारे अडथळा येणार नाही, याबाबतची दक्षता सर्व क्षेत्रीय महसूल अधिकाऱ्यांनी कटाक्षाने घ्यावी.

३. उपरोक्त निर्देश हे राष्ट्रीय महामार्गाच्या कामासंबंधीच लागू राहतील.

४. सदर परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १०६/२०१७/व्यय-९, दिनांक २३/०३/२०१७ नुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०६१३१७५३२५०७१९ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a8518, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2017.06.14 13:58:19 +05'30'

**( राजेंद क्षीरसागर )**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई-४०००३२.
७) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) उर्वरित सर्व मंत्रालयीन विभाग.
१०) सर्व विभागीय आयुक्त.
११) सर्व जिल्हाधिकारी.
१२) सर्व उपविभागीय अधिकारी.
१३) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
१४) सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुबई ४०० ०३२.